**शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधीच्या (Trust) ठेव रक्कमेत रु.३५.०० कोटी वरुन रु.१५.०० कोटी एवढी वाढ करुन एकूण ठेव रक्कम रु.५०.०० कोटी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पूरक-२०२२ /प्र.क्र.१४६/कार्या ३४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**दिनांक : ३१ मार्च, २०२३**

**वाचा :-**

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.माजम-२००९/५७३/प्र.क्र.१००/३४, दि.०१/०८/२००९
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.मावज-२०१६/प्र.क्र.८१/३४ दि.२९.०३.२०१६
३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.मावज-२०१३/प्र.क्र.१९५/३४ दि.०२.०२.२०१९
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.पुरक-२०१८/प्र.क्र.२६/३४ दि.२५.०२.२०१९
५. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.पुरक-२०२१/प्र.क्र.१४३/ ३४ दि.०१.०२.२०२२.
६. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.पुरक-२०२१/प्र.क्र.१४३/ ३४ दि.१०.०३.२०२२.
७. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे पत्र क्र.वृत्त-(२०२२)/पत्रकार सन्मान योजना/ का-२/२७२/दि.१०.०६.२०२२
८. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे पत्र क्र.वृत्त- प्रशासन/शं.क.नि.पु.मा.निधी/ २०२३/११० दि.२३.०२.२०२३.

**प्रस्तावना:-**

पत्रकारांना दुर्धर आजार, अपघात झाल्यास किंवा आकस्मिक मृत्यू झाल्यास त्यांना किंवा त्यांच्या कुटूंबियांस मदत करण्याच्या उद्देशाने "शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधी (Trust)" ची स्थापना संदर्भ क्र. १ च्या दि.०१.०८.२००९ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. तसेच, संदर्भ क्र.३ च्या दि.०२.०२.२०१९ च्या शासननिर्णयान्वये "शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधी (Trust)" या योजनेच्या विश्वस्त मंडळामार्फत "आचार्य बाळशास्त्री जांभेकर सन्मान योजना" राबविण्यास मान्यता देण्यात आली.

**"शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधी** (Trust) **"** अंतर्गत शासनाने वेळोवेळी निधी उपलब्ध करुन दिला असून शासननिर्णय दि.२९.०३.२०१६ अन्वये रु.१०.०० कोटी , शासननिर्णय दि.२५.०२.२०१९ अन्वये रु.१५.०० कोटी आणि शासननिर्णय दि.०१.०२.२०२२ अन्वये रु.१०.०० कोटी असे एकूण रु. ३५.०० कोटी इतका निधी आहरित करुन राष्ट्रीयकृत बँकेत ठेव म्हणून ठेवण्यास मान्यता देण्यात आली आहे. सद्य:स्थितीत शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या रु.३५.०० कोटी इतका निधी राष्ट्रीयकृत बँकेत ठेव म्हणून जमा आहे त्यावरील व्याजाच्या रक्कमेतून अधिस्विकृतीधारक पत्रकारांना आजारावरील वैद्यकिय उपचारांकरीता मदत आणि अधिस्विकृतीधारकाचा मृत्यू झाल्यास त्यांच्या

कुटूबियांना आर्थिक मदत दिली जाते. तसेच **"आचार्य बाळशास्त्री जांभेकर सन्मान योजना"** यांतर्गत ज्येष्ठ पत्रकारांना मासिक रु.११,०००/- इतका सन्मान निधी दिला जातो.

आर्थिक वर्षात ज्येष्ठ पत्रकारांच्या संख्येत वाढ अपेक्षित असल्यामुळे या योजनेवरील खर्च भागविण्यासाठी शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधीमध्ये (Trust) ठेव रक्कम रु.३५.०० कोटी वरुन रु.५०.०० कोटी करण्यासाठी जुलै,२०२२ च्या अधिवेशनात पुरक मागणीव्दारे रु.१५.०० कोटी इतका निधी मंजूर करुन घेण्यात आला होता. सदर निधी राष्ट्रीयकृत बँकेत ठेव म्हणून ठेवावयाची आहे. याबाबत शासनाने पुढील निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय:-**

अधिस्विकृतीधारक पत्रकारांना व ज्येष्ठ पत्रकारांना आर्थिक सहाय्य देण्यासाठी सुरु करण्यात आलेल्या "शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधी (Trust)" च्या विश्वस्त मंडळामार्फत ज्येष्ठ पत्रकारांसाठी "आचार्य बाळशास्त्री जांभेकर पत्रकार सन्मान योजना" राबविण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजनेचा खर्च भागविण्याकरीता "शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधी (Trust)" करीता पुरक मागणीव्दारे मंजूर झालेला रु.१५.०० कोटी इतका निधी बिम्स प्रणालीवर (BEAMS) वित्त विभागाव्दारे उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

२. सदर प्रयोजनासाठी येणारा खर्च सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र. ए-६ प्रधान लेखाशिर्ष २२२० - माहिती व प्रसिध्दी, ०१ - चित्रपट, ००१- संचालन व प्रशासन (००) (०१), प्रसिध्दी संचालक (२२२० ००४३) ३१ - सहायक अनुदान या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ मध्ये पूरक मागणीद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या रु.१५.००कोटी इतका निधी आहरित करुन सदर निधीचा विनियोग करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. "शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधी (Trust) ची ठेव रक्कम रुपये १५,००,००,०००/- (रुपये पंधरा कोटी फक्त) इतक्या रकमेचे आहरण व संवितरणाचे अधिकार लेखाधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई यांना देण्यात येत आहेत. सदर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याची जबाबदारी उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांची राहील.

४. हा शासननिर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.१२८/२३ (व्यय-४) दिनांक १६ .०३.२०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३११२४४४११८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RIMA SUBHASH DUTTAROY

Digitally signed by RIMA SUBHASH DUTTAROY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=487393c812e41c98e63a7a73c63e1d078da4c3c899b4307a07d4d99b40a7d635, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B813A4CECE1744D0527A20F20D15FC2FFC7D4457A8AE2120E0D35781B42C049C, cn=RIMA SUBHASH DUTTAROY
Date: 2023.03.31 12:51:35 +05'30'

**(रिमा दत्तरॉय)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई

२. मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
६. महालेखापाल, १ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), १/२ मुंबई / नागपूर.
७. सर्व संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८. मा. मुख्यमंत्र्यांचे जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
९. मा. उपमुख्यमंत्र्यांचे जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
१०.उपसचिव,व्यय-४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.उपसचिव, कार्या-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१३.सर्व कोषागार अधिकारी, सर्व कोषागार कार्यालय.
१४.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१५.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१६.निवडनस्ती, कार्या-३४.